# शांतिमंत्र

**ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवः । भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ।**

**स्थिरैरङ्गैस्तुष्टुवासस्तनुभिः।व्यशेम देवहितं यदायुः स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः । स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः । स्वस्ति नस्ताक्ष्र्यो अरिष्टनेमिः । स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु ॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥**

ॐ भद्रम् कर्णेभिः शृणुयाम देवाः भद्रम् पश्येम अक्षभिः यजत्राः स्थिरैः अङ्गैः तुष्टुवान् सस्तनुभिः।व्यशेम देवहितम् यदायुः स्वस्ति नः इन्द्रो वृद्धश्रवाः स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः स्वस्ति नः ताक्ष्र्यः अरिष्टनेमिः स्वस्ति नः बृहस्पतिः दधातु ॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

ॐ

भद्रम् मंगल भद्र नपु. प्र. ए. व.

कर्णेभिः कानांनी कर्ण पु. तृ. ब. व. आर्ष रूप

शृणुयाम ऐकावे श्रु धातु कर्तरि विधिलिङ् लकारः परस्मै पदम् उ. पु. ए. व.

देवाः देव पु. प्र. ब. व.

भद्रम् मंगल भद्र नपु. प्र. ए. व.

पश्येम पहावे दृश् धातु कर्तरि विधिलिङ् लकारः परस्मै पदम् उ. पु. ब. व.

अक्षभिः डोळ्यांनी अक्ष पु. तृ. ब. व. आर्ष रूप

यजत्राः यज्ञ करणारा यजत्र पु. प्र. ब. व.

यज् धातु यज्ञ करणे +अत्रन् प्रत्यय

स्थिरैः सुदृढ स्थिर नपु. तृ. ब. व.

अङ्गैः अवयवांनी अङ्ग नपु. तृ. ब. व.

तुष्टुवांसः स्तुती तुष्टुवस् तुष धातु संतुष्ट होणे तुक् प्रत्यय पु. प्र. ए. व.

तनुभिः शरीराने तनु स्त्री. तृ. ब. व.

व्यशेम व्यतीत करावे वि+अश् धातु कर्तरि उ. पु. ब. व.

देवहितम् देवांचे कार्य करत देवहित नपु. प्र. ए. व.

यदायुः आयुष्यभर यदा+आयु स्त्री. प्र. ए. व.

स्वस्ति मंगल सु+अस् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

नः आमचे अस्मद् द्वि. ब. व.

इन्द्रः इन्द्र पु. प्र. ए. व.

वृद्धश्रवाः कीर्तिमान वृद्धश्रव पु. प्र. ब. व.

स्वस्ति मंगल सु+अस् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

नः आमचे अस्मद् द्वि. ब. व.

पूषा पोषण करणारा सूर्यदेव पूषन् पु. प्र. ए. व.

विश्ववेदाः सर्वज्ञ विश्ववेद पु. प्र. ब. व.

स्वस्ति मंगल सु+अस् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

नः आमचे अस्मद् द्वि. ब. व.

ताक्ष्र्यः गरूड /वायु ताक्ष्र्य पु. प्र. ए. व.

अरिष्टनेमिः संकटमोचक अरिष्टनेमि पु. प्र. ए. व.

स्वस्ति मंगल सु+अस् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

नः आमचे अस्मद् द्वि. ब. व.

बृहस्पतिः बृहस्पति पु. प्र. ए. व.

दधातु लाभो धा धातु धारण करणे कर्तरि लोट् लकारः परस्मै पदम् प्र. पु. ए. व.

ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

मानवाने कितीही प्रगती केली तरी शांती मिळवण्याचे तंत्रज्ञान अजून तरी विकसित झालेले नाही. शांती मिळवण्यासाठी योग, ध्यानधारणा आणि शांतिमंत्र यांचाच आधार घ्यावा लागतो. असा विचार केला तर आपल्या ऋषींचे द्रष्टेपण दिसून येते. उपनिषदांचे पठण करण्यापूर्वी मन आणि तेथील वातावरण शांत करणे, मंगलमय करणे ह्या हेतूने शांतिमंत्र गुरू आणि शिष्यांकडून म्हटला जातो. तसेच तो उपनिषदाचे पठण संपल्यावर सुद्धा म्हटला जातो. आपल्या शारीरिक, मानसिक आणि आध्यात्मिक प्रगती साठी शांतीची कामना ह्या मंत्राद्वारे केली जाते.

5 महत्त्वाच्या शांतिमंत्रांपैकी एक असा हा शांतिमंत्र प्रश्नोपनिषद, मुण्डकोपनिषद् आणि माण्डुक्योपनिषद् या उपनिषदात दिलेला आहे.

हा मंत्र ऋग्वेदात मंडल 1, सूक्त 89, मंत्र 8,

सामवेद 1874 तसेच शुक्ल यजुर्वेदातील अध्याय 25 श्लोक 21 मध्ये मंत्राचा पहिला भाग सापडतो.

ह्या मंत्रात सूर्य अग्नी इंद्र वरूण इत्यादी देवतांना आवाहन केले आहे, म्हणजेच पंचमहाभूतांचे महत्त्व विशद केले आहे.

मंत्राच्या पहिल्या भागात सर्वांची प्रगती होण्यासाठी फक्त शुभ गोष्टी कानावर पडाव्या, मंगलमय गोष्टी डोळ्यांसमोर याव्या, आणि आमच्या मनात कायम ईश्वराचे स्मरण असावे अशी इच्छा व्यक्त केली आहे.

मंत्राच्या दुसऱ्या भागात कीर्तीमान आणि प्राचीन असा इन्द्रदेव, सर्वांचे पोषण करणारा सूर्यदेव, सर्व हानीपासून रक्षण करणारा वरूण आणि बुद्धी सामर्थ्यवान बृहस्पती यांचे आशीर्वाद लाभावे अशी याचना केली आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

ॐ

हे देवतांनो! आम्हाला आमच्या कानांनी शुभवचने ऐकू देत, डोळ्यांनी मंगलमय गोष्टी पाहू दे. आम्हाला लाभलेल्या आयुर्मर्यादा भर, आमच्या सुदृढ अवयव असलेल्या शरीराने आम्ही आपली स्तुती करावी.

प्राचीन आणि कीर्तीमान असे इन्द्र देव, सर्व ज्ञानी आणि पोषण करणारे सूर्य देव, सर्व अपायांपासून रक्षण करणारे वायुदेव, अध्यात्मिक संपदा प्राप्त करण्यासाठी बुद्धिसामर्थ्य देणारे बृहस्पति ह्या सर्वांचे आम्हाला आशिर्वाद लाभो.

---------🙏🙏🙏🙏🙏-----

इति अनघा